वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) अंतर्गत (अनिवार्य) अनुदान वितरीत करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मकृवि-१२२२/प्र. क्र.४३/७-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २३ मार्च, २०२२.**

**वाचा :-** १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे पत्र क्र. सीएफबी/३६४४/२०, दि.३१.१२.२०२१.
३) नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे पत्र क्र. सीएफबी/४७३/२२, दि.०४.०३.२०२२.

**प्रस्तावना:-**

सन २०२१-२२ आर्थिक वर्षात वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी करीता ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून निधी वितरीत करण्याबाबत नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांनी उपरोक्त संदर्भ क्र. २ व ३ च्या पत्रांन्वये निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. यास्तव निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ आर्थिक वर्षात वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी करीता २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन (२४१५ ००५२), ०३-पशुसवर्धन (२४१५ ०२०३) (अनिवार्य) **३१-सहायक अनुदान (वेतनेतर)** या बाबीकरीता सुधारीत अंदाजपत्रकातील तरतुदीच्या ३० टक्के प्रमाणात खालीप्रमाणे एकुण रु. १,७०,५०,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सत्तर लाख पन्नास हजार रुपये फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | लेखाशीर्ष (अनिवार्य) | सन २०२१-२२ करीता सुधारीत अंदाज तरतूद | सन २०२१-२२ वर्षात एकूण वितरीत अनुदान | सन २०२१-२२ साठी विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान (३० टक्के मर्यादेत) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| १) | ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००५२)<br>३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | ५६२.५२ | ०० | **१६८.८** |
| २) | ०३ पशुसंवर्धन (२४१५ ०२०३)<br>३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | ५.८१ | ०० | **१.७४** |
| | **एकूण** | **५६८.३३** | **००** | **१७०.५** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) कृषि विद्यापीठांनी योजना/योजनेतर आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत अनिवार्य योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.

२) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) ज्या योजनांतर्गत/योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

४) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

५) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१

मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२१-२२ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी, या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.७५/२२/व्यय-१, दि.११.०३.२०२२ सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३२३१५०६२१२७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.03.23 15:09:22 +05'30'

**(वर्षा मेहेर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,

३. उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी,
४. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी / उपकोषागार अधिकारी, परभणी,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
८. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१०.कक्ष अधिकारी /अवर सचिव, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.